राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत (जल जीवन मिशन) सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.....
सहाय्यीकृत बाबी, पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (लेखाशीर्ष २२१५ ९९७१)

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
**शासन निर्णय क्रमांकः निवित-२०२०/प्र.क्र.२४ (२)/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ३ ऑगस्ट,२०२०

<u>वाचा-</u>

१) अवर सचिव, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र.क्र. **W-11020/197/2015** दि.२५ नोव्हेंबर,२०१९
२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे पत्र क्र. पा.व.स्व.स.सं/पागुशा ००१९/ प्र.क्र.०१/२०२०/५३ दि.१७ जानेवारी,२०२०
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.निवित-२०२०/प्र.क्र.२४(१)/पापु १०, दि.३ ऑगस्ट, २०२०.

<u>प्रस्तावना-</u>

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने संदर्भिय क्र.१ च्या पत्रान्वये राज्यास वित्तीय वर्ष २०१९-२० करीता निधी उपलब्ध करुन दिलेला आहे.. सदर निधीच्या ५ % निधी सहाय्यीकृत बाबींकरीता तर २% निधी पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण या घटकाकरीता उपयोगात आणण्यास केंद्र शासनाच्या संदर्भिय पत्रान्वये अनुमती देण्यात आली आहे. तथापि तांत्रिक कारणांमुळे या घटकाचा निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात कोषागारातून आहरित करता आला नव्हता. त्यामुळे या घटकासाठी रुपये २४.०० कोटी इतका केंद्र हिश्श्याचा निधी संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये वितरित करण्यात आला आहे. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support)आणि पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) या घटकासाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदानाच्या प्रमाणानुसार (केंद्र ६०:

राज्य ४०) सहाय्यीकृत बाबी (Support) आणि पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) या घटकासाठी राज्य हिश्श्यांतर्गत निधी खर्च होणे आवश्यक आहे. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात या घटकासाठी राज्य हिश्श्याचा निधी देखील कोषागारातून आहरित केलेला नसल्यामुळे चालू आर्थिक वर्षात या घटकासाठी वितरित केलेल्या केंद्र हिश्श्याच्या प्रमाणात राज्य हिश्श्याचा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय-</u>

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (जल जीवन मिशन) या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून सहाय्यीकृत बाबी (Support) आणि पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) या घटकासाठी प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या प्रमाणानुसार (केंद्र ६०: राज्य ४०) सहाय्यिकृत बाबी (Support) आणि पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQMS) या घटकासाठी राज्य हिश्श्यांतर्गत अनुक्रमे रु.११,४०,००,०००/- व रु.४,६०,००,०००/- असे एकुण रु.१६,००,००,०००/- (अक्षरी-रुपये सोळा कोटी फक्त) इतका निधी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांना खालील अटींच्या अधिन राहून मंजूर व मूक्त करण्यात येत आहे.

१) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर यांनी या अनुदानातुन केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व जल जीवन मिशन या कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यास लेखा परिक्षणाकरीता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखपाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

२) ग्राम विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र.आरसीएन-१०८९/सीआर-३०२७/२८, दि.०५ सप्टेंबर,१९९० मधील सूचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना पाणी पुरवठा व स्वच्छता संस्था, बेलापूर यांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु -२० यांना सादर करावे.

३) यामंजूर अनुदानाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत

४) राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या योजना प्रणालीवर नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात

५) या घटकांतर्गत उपलब्ध करुन दिलेला निधी अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.

६) सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

२. यावर होणारा खर्च “मागणी क्र.वाय-०२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम सहाय्यीकृत बाबी व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय (राज्य हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९९७१)” या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत लेखाशीर्ष २२१५ ९९७१ या खाली सहाय्यीकृत बाबी (Support) व पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण या घटकासाठीचा रु.१६,००,००,०००/- ( अक्षरी- रुपये सोळा कोटी फक्त) एवढा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी अवर सचिव (रोखशाखा) (श्री.पां.रा.खोटरे) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री.पां.रा.खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी त्वरीत कोषागारातून आहरित करावी व तद्नंतर स्वतंत्र धनादेशाद्वारे सदर रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर रक्कम केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार तसेच राज्य शासनाने या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावी.

४. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६/०४/२०२० सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.संदर्भ.क्र. १४१/व्यय ३ दि.२९.०७.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३१२५०४४२०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.08.03 16:26:27 +05'30'

**वसंत माने**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अवर सचिव (श्री.पां.रा.खोटरे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई
६. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
८. कार्यासन पापु-०४/१२/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
१०.निवडनस्ती कार्यासन पापु-१०